महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते यासाठी प्राधिकरणाला अनुदानापोटी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मजीप्रा-१११८/प्र.क्र.११४/पापु-२३**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख: २ जुलै, २०१८

**वाचा :-**

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः मजीप्रा-२०१४/प्र.क्र.३३(अ)/पापु-२३, दिनांक २३.०३.२०१७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते तसेच निवृत्तीवेतन यांचे दायित्व शासनाने स्वीकारण्याचा व महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे जमा होणारे ईटीपी चार्जेस व तांत्रिक शुल्क शासनाकडे जमा करण्याचा धोरणात्मक निर्णय मंत्रीमंडळाने दिनांक १६.०३.२०१७ च्या बैठकीमध्ये घेतला असून त्यानुषंगाने संदर्भाधीन दिनांक २३.०३.२०१७ चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते अदा करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला अनुदान म्हणून २२१५A०४१ या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष सन २०१८-१९ करिता रुपये १८५,६१,००,०००/- (अक्षरी रुपये एकशे पंच्याऐंशी कोटी एकसष्ठ लाख फक्त) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. वित्त विभागाने उपरोक्त परिपत्रकान्वये सन २०१८-१९ करीता सदर तरतूदीपैकी ७० % निधी अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला आहे. त्यास अनुसरुन सन २०१८-१९ मध्ये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला उपरोक्त

लेखाशिर्षांतर्गत माहे एप्रिल, २०१८ ते जून, २०१८ या तीन महिन्यांकरीता निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला अनुदान म्हणून "मागणी क्रमांक - वाय २, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१) आस्थापना (०१)(०४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन व भत्त्यापोटी सहायक अनुदान, (अनिवार्य/दत्तमत) (२२१५A०४१), ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशीर्षांतर्गत सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या रकमेपैकी रुपये ३४,२६,६०,०००/-(अक्षरी रुपये चौतीस कोटी सव्वीस लाख साठ हजार फक्त) इतकी रक्कम या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

अ) सन २०१७-१८ मध्ये वेतन / भत्त्यासाठी वितरीत केलेल्या एकूण निधीपैकी अखर्चित असलेला रुपये १९,४७,५७,३१२/- (अक्षरी रुपये एकोणीस कोटी सत्तेचाळीस लाख सत्तावन्न हजार तीनशे बारा फक्त) इतका निधी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने शासनास प्रथम जमा करावा.

ब) या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या नियमित आस्थापनेवरील कर्मचा-यांच्या सन २०१८-१९ मधील वेतन / भत्त्यासाठी वापरण्यात यावा. वेतन / भत्त्यांच्या यापूर्वीच्या कोणत्याही थकबाकीसाठी या निधीचा वापर करु नये. या निधीचा अन्य बाबींवरील खर्च (विनियोग) ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल व अशा कृतीसाठी संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहतील.

क) सन २०१८-१९ मध्ये जून २०१८ अखेर प्राधिकरणाकडे जमा झालेले तांत्रिक शुल्क व ईटीपी चार्जेस शासनाकडे जमा करावेत.

२. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेली रक्कम प्राप्त करुन घेण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त), श्री. सुधाकर डांगे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तर श्री.म.भ.सावंत, उपसचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. शासनाद्वारे देण्यात येणारे वेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत वेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

४. सदर रकमेच्या प्रत्यक्ष खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी सादर करावे. उपयोगिता प्रमाणपत्र सादर करताना कर्मचारीनिहाय प्रत्यक्ष वितरीत रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

५. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च “मागणी क्रमांक - वाय २, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१) आस्थापना (०१)(०४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन व भत्त्यापोटी सहायक अनुदान, (अनिवार्य/दत्तमत) (२२१५A०४१), ३६, सहायक अनुदाने (वेतन)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०१८-१९ च्या मंजूर आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत. या परिपत्रकान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०२१२५८५६२१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Balasaheb B Hajare

Digitally signed by Balasaheb B Hajare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, cn=Balasaheb B Hajare
Date: 2018.07.02 15:50:51 +05'30'

**( बाळासाहेब बा. हजारे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण

प्रत: माहितीस्तव,

वित्त विभाग, व्यय-३/ अर्थसंकल्प-१८ कार्यासन, मंत्रालय, मुंबई.
पापु-४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई.
निवडनस्ती, पापु-२३